पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील पदे नव्याने निर्माण करणे आणि अभियांत्रिकी सेवा संवर्गातील पदांची पदनामे व वेतनश्रेण्या शासनाच्या समकक्ष पदांशी सुसंगत करणे.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.पीएमसी-२००९/२२५/प्रक्र-६३६/०९/नवि-२२
मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
दिनांकः- 31 ऑगस्ट, २००९

वाचा : १) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचे पत्र मआ/उआ(जि.प्र.)/से/२२०८, दि. १.११. २००८ व त्यासोबतचे स्थायी समिती ठराव क्र. १८६७ दि. १६.०२.२००८ व महासभा ठराव क्र. १४० दि. २३.७.२००८

२) मुख्य उद्यान अधिक्षक (सेवकवर्ग विभाग), पुणे महानगरपालिका, पुणे यांचे पत्र क्र. उका /से /३३२२,दि. १२.०२.२००९

३) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचे पत्र मआ/से/८५३, दि. १६/०७/२००९.

**प्रस्तावना:-**

पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील काही पदे नव्याने निर्माण करण्यासाठी आणि महानगरपालिकेच्या अभियांत्रिकी सेवा संवर्गातील पदांची पदनामे व वेतनश्रेण्या शासनाकडील अभियांत्रिकी सेवा संवर्गातील समकक्ष पदनामांशी आणि वेतनश्रेण्यांशी सुसंगत करण्याबाबत स्थायी समिती ठराव क्र. १८६७ दि. १६.०२.२००८ व महासभा ठराव क्र. १४० दि. २३.७.२००८ हे ठराव पारीत केले आहेत. त्याअनुषंगाने पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील काही पदे नव्याने निर्माण करण्यास आणि अभियांत्रिकी सेवा संवर्गातील कनिष्ठ अभियंता या निम्न स्तरावरील पदांपासून नगर अभियंता या वरिष्ठ स्तरावरील पदांपर्यंत पदनामात आणि वेतनश्रेणीत सुसंगता/सुसूत्रता आणण्यासाठी, महानगरपालिकेच्या अभियांत्रिकी सेवा संवर्गातील पदांची पदनामे व वेतनश्रेण्या शासनाकडील अशा पदांशी सुसंगत करुन सुधारीत करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांनी शासनास सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील वस्तुस्थिती आणि महानगरपालिकांचे वर्गीकरण, आस्थापना खर्च इत्यादी बाबी विचारात घेवून, पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अभियांत्रिकी सेवा संवर्गातील पदांची पदनामे व वेतनश्रेण्या अनुक्रमे पुढील तक्ता- अ मधील रकाना क्र. ३-अ व ३-ब मध्ये नमूद केल्याप्रमाणे सुधारीत करण्यास आणि आयुक्तांचे स्वीय सहायक, उपअभियंता तथा नियोजन अधिकारी या अभिनामांचे

प्रत्येकी एक पद पुढील तक्ता- ब मध्ये नमुद वेतनश्रेणीत नव्याने निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम-५१ अन्वये प्राप्त अधिकारात शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

तक्ता - अ

| अ.क्र. | पुणे मनपा अभियांत्रिकी सेवा संवर्ग | | | |
|---|---|---|---|---|
| | सध्याचे पदनाम | सध्याची वेतनश्रेणी (रक्कम रुपयांत) | सुधारीत पदनाम | सुधारीत वेतनश्रेणी (रक्कम रुपयांत) |
| (१) | (२ अ) | (२ ब) | (३ अ) | (३ ब) |
| १. | अ) कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) | ५५००-९००० | कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) | ५५००-१७५-९००० |
| | ब) कनिष्ठ अभियंता (पदवीधारक) | ६५००-१०५०० | कनिष्ठ अभियंता (पदवीधारक) | ६५००-२००-१०५०० |
| २. | दुय्यम अभियंता | ६५००-१०५०० | शाखा अभियंता | ६५००-२००-१०५०० |
| ३. | अ) सहाय्यक अभियंता (जूनी वेतनश्रेणी) | ८०००-१३५०० | उपअभियंता | ८०००-२७५-१३५०० |
| | ब) सहाय्यक अभियंता (नविन वेतनश्रेणी) | ६५००-१०५०० | | |
| ४. | नगर उपअभियंता | १००००-१५२०० | कार्यकारी अभियंता | १०६५०-३२५-१५८५० |
| ५. | विकास अभियंता | १०६५०-१५८५० | अधिक्षक अभियंता | १२०००-३७५-१६५०० |
| ६. | अतिरिक्त नगर अभियंता | १०६५०-१५८५० | अतिरिक्त नगर अभियंता | १४३००-४००-१८३०० |
| ७. | नगर अभियंता | १२०००-१६५०० | नगर अभियंता | १६४००-४५०-२०९०० |

तक्ता- ब

| अ.क्र. | विभागाचे नांव | पदनाम | वेतनश्रेणी (रक्कम रुपयांत) | नवनिर्मित पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | आयुक्त कार्यालय | आयुक्तांचे स्वीय सहाय्यक | ७४५०-११००० | १ |
| २ | आयुक्त कार्यालय | उपअभियंता तथा नियोजन अधिकारी | ८०००-१३५०० | १ |

०२. सदरील आदेशानुषंगाने आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका,पुणे यांनी सर्व संविधानिक बाबींची पूर्तता करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नांवाने.

(सुनिल कोठेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.सचिव (२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
४) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२